अर्थसंकल्पीय अनुदान वर्ष २०१८-१९.
नगरपालिका व नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान.
लेखाशिर्ष वाय-२, २२१५, ( २२१५ १६४७ )
( वेतनेतर ) नगर परिषद, मंगळवेढा, जि.सोलापूर

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांकः मजीप्रा-२०१८/प्र.क्र.७१/पापु-२१
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत, लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय,मुंबई-४०० ००१.
दिनांक :- ११ जानेवारी, २०१९

वाचा :-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८
२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांक: सुनिअ २०१४/प्र.क्र.३४४/पापु-२२, दिनांक २६ ऑक्टोबर, २०१८

प्रस्तावना

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता विधीमंडळाने मंजूर केलेल्या अनुदानाच्या तरतूदीच्या अनुषंगाने नागरी भागातील पाणी पुरवठा कार्यक्रम, या योजनांतर्गत कार्यक्रमाखालील नगरपालिका/ नगरपरिषदांच्या (स्थानिक संस्था ) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान ( २२१५ १६४७), या कार्यक्रमाकरीता, सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात रु. १०,००,००,०००/- ( रुपये दहा कोटी फक्त ) इतके अर्थसंकल्पीय अनुदान मंजूर करण्यात आले असून अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर रु. ७,००,००,०००/- ( रुपये सात कोटी फक्त ) एवढे अनुदान उपरोक्त नमूद क्रमांक १ च्या शासन परिपत्रकान्वये वित्त विभागाकडून वितरणासाठी उपलब्ध करुन देण्यात आले आहे.

२. सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर असलेल्या उपरोक्त नमूद अर्थसंकल्पीय अनुदानापैकी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या रु. ७,००,००,०००/- ( रुपये सात कोटी फक्त ) एवढया अनुदानातून रु. २५,३२,१७८/- ( रुपये पंचवीस लाख, बत्तीस हजार, एकशे अठ्ठयाहत्तर फक्त) एवढे अनुदान मुक्त व वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यास अनुसरुन पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे. :-

**शासन निर्णय**

राज्यातील नागरी क्षेत्रातील नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान, या कार्यक्रमाखालील महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान योजनांचे कार्यान्वयन पाणी व स्वच्छता सहाय संस्था यांचेकडून करण्यात येते.

२. सदर नागरी पाणी पुरवठा योजनांच्या कार्यान्वयनाकरीता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात, मागणी क्रमांक वाय-२, २२१५, १९२, नगरपालिका/नगरपरिषदांना सहाय्य (०२) राज्य योजना-(०२) (०२) नगरपालिकांच्या ( स्थानिक संस्था ) पाणीपुरवठा व जलनि:सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान, लेखाशिर्ष २२१५ १६४७, ३१, सहाय्यक अनुदाने ( वेतनेतर) या कार्यक्रमाखाली मंजूर असलेल्या रुपये १०,००,००,०००/- ( रुपये दहा कोटी फक्त ) इतक्या अर्थसंकल्पीय अनुदानापैकी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध असलेल्या रु.७,००,००,०००/- ( रुपये सात कोटी फक्त ) एवढया अनुदानातून रु. २५,३२,१७८/- ( रुपये पंचवीस लाख, बत्तीस हजार, एकशे अठ्ठयाहत्तर फक्त) एवढे अनुदान संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई यांना या शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधीन राहून सशर्त मुक्त व वितरीत करण्यात येत आहे. या वितरीत व मुक्त तरतुदीचे वाटप विवरणपत्रामध्ये दर्शविण्यात आले आहे.

विवरणपत्र

(रक्कम रुपयांत)

| अ.क्र. | योजनेचे नांव | वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|
| १ | मंगळवेढा नगरपरिषद, जि.सोलापूर | २५,३२,१७८/- |
| एकूण - १ नगरपरिषद | | २५,३२,१७८/- |

- सदर अनुदानाच्या रकमेचे स्वतंत्र लेखे ठेवण्यात यावेत. शासनाच्या निदेशानुसार सदर अनुदान नागरी संस्थांना वितरीत करण्यात यावे.
- अनुदानाची रक्कम ज्याकरीता मंजूर व मुक्त करण्यात आली आहे, त्या विनिर्दिष्ट प्रयोजनाकरीताच दिनांक ३१ मार्च, २०१९ पर्यंत खर्च करावी.
- या मुक्त अनुदानातून होणा-या वाटपाची माहिती पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेने शासनाला कळवावी.
- सदर अनुदानातून पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेने सदर योजनांकरिता केलेल्या खर्चाचे लेखे तपासणीचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर यांना किंवा खास अधिकार दिलेला या विभागातील अधिकारी यांना देण्यात येत आहेत. याबाबत संबंधित कागदपत्रे, महालेखापाल किंवा खास अधिकार दिलेला विभागातील अधिकारी यांनी मागणी केल्यास पाणी व स्वच्छता सहाय संस्थेने त्यांना तात्काळ उपलब्ध करुन द्यावीत.

- मुंबई वित्तिय नियम, १९५९ मधील जोडपत्र-२ मधील नियम क्रमांक ३ अनुसार महालेखापालांच्या मागणीनुसार प्राधिकरणाचे लेखे संबंधित कागदपत्रांसह निरीक्षणाकरिता, पाणी व स्वच्छता सहाय संस्थेने महालेखापालांना सादर करावेत.
- पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेला शासनाकडून जी अनुदाने प्राप्त झालेली आहेत किंवा जी अनुदाने यापुढील कालावधीत प्राप्त होतील त्या अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेने द्यावयाची आहेत. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था यांनी उपयोगिता प्रमाणपत्रात दर्शविलेल्या मंजूर व मुक्त अनुदानाच्या व खर्चाच्या कार्यक्रमनिहाय रकमा प्रमाणित करुन स्वाक्षरीत कराव्यात. त्या उपयोगिता प्रमाणपत्रावर सह सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांनी प्रतिस्वाक्षरी करावी , अशी प्रमाणपत्रे शासनाला स्विकारार्ह होतील.
- सदर अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित नमुन्यात शासनाला सादर करावे तसेच उपयोगिता प्रमाणपत्राच्या प्रती महालेखापालांनाही पाठवाव्यात.
- सदर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा आणि विहित अहवाल विहित दिनांकास, लेखा अधिकारी, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१ यांच्याकडे सादर करावा.
- या शासन निर्णयान्वये संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला निधी संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांचेकडे BEAMS प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. हा निधी उपकोषागार कार्यालय, कोकणभवन, नवी मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.आर.के.साकोरे, संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांना तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून श्री.म.बा.हजारी, सह सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी तथा संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांनी या आदेशान्वये वितरीत करण्यात आलेली रक्कम उपकोषागार कार्यालय, कोकणभवन, नवी मुंबई यांचे कार्यालयातून आहरित करुन सदर रक्कम ही एनईएफटी (NEFT) प्रणालीद्वारे पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांच्या खाती जमा करण्यात यावी.

३. या वितरीत केलेल्या अनुदानातून होणारा खर्च, मागणी क्रमांक वाय-२, २२१५, १९२, नगरपालिका/नगरपरिषदांना सहाय्य (०२) राज्य योजना- (०२) (०२) नगरपालिकांच्या/ नगरपरिषदांच्या पाणीपुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान, २२१५ १६४७, ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर), या लेखाशीर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी मंजूर तरतूदीतून भागवावा.

४. प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ मधील परिच्छेद ७ मधील सूचना क्र.(७) तसेच परिशिष्टातील अ.क्र. ८ मधील आवश्यक त्या तपासणी सूची क्र.१,२,३ व ४ ची पूर्तता झालेली आहे.

५. सदर शासन निर्णय हा वित्तीय अधिकार नियम पुस्तीका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग-तीन, अ.क्र.५, परिच्छेद क्र. २७ (२) अन्वये विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१९०१११२३५०९६८२८** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Mahendra B Hajari

Digitally signed by Mahendra B Hajari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Environment Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2a611aa6775332ae4fb220e8dd3ec11f80d6b95fec14b729156665cff860b06b, serialNumber=4d2c04ec5ad8ef37ec32a9360d83d2731bb0d44617af98bbd8b8b0fbdbc2a914, cn=Mahendra B Hajari
Date: 2019.01.11 16:25:23 +05'30'

**( म.बा.हजारी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) ओल्ड सी .जी .ओ . इमारत, न्यू मरीन लाईन्स, १०१, महर्षी कर्वे मार्ग, मुंबई - ४०० ०२०.
४) महालेखापाल, महाराष्ट्र -२, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) भारतीय लेखा व लेखापरीक्षा विभाग कार्यालय, सिव्हिल लाईन्स, वेस्ट हायकोर्ट रोड, नागपूर - ४४० ००१.
५) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. (५ प्रतींसह)
६) मा. मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा. राज्यमंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) नियंत्रक अधिकारी तथा उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१
९) आहरण व संवितरण अधिकारी तथा संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई-४०० ६१४ ( ५ प्रतीसह )

१०) जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर.
११) मुख्याधिकारी, मंगळवेढा नगरपरिषद, जिल्हा सोलापूर.
१२) उप कोषागार अधिकारी, कोकणभवन, बेलापूर, नवी मुंबई- ४०० ६१४ .
१३) कक्ष अधिकारी, वित्त विभाग, कार्यासन क्रमांक व्यय- ३, बीयुडी- १८, अर्थोपाय, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१४) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग, कार्यासन क्रमांक १४४३, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१५) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, कार्यासन क्रमांक पापु-०४, पापु-०५, पापु-२०, पापु-२२ मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
१६) ग्रंथालय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ६ वा मजला, विधानभवन, मुंबई ४०० ०३२.
१७) निवडनस्ती ( पापु-२१ )